201107061409335001

**महानगरपालिका व नगरपरिषदांमध्ये कंत्राटी तत्वावर कामे देतांना किमान वेतन कायद्याची अंमलबजावणी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०११/प्र.क्र.७५/ नवि २०
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक : १५ जून, २०११

**वाचा :-** शासन अधिसुचना, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक किवेअ ४२०१०/ प्र.क्र.१३०९/कामगार-७, दिनांक २८/९/२०१०

**<u>शासन परिपत्रक</u>** :-

राज्यातील सर्व महानगरपालिका व नगरपरिषदांमध्ये विविध कामांसाठी कंत्राटे देण्यात येतात.संबंधित कंत्राटदार कामाच्या स्वरुपानुसार आवश्यकतेप्रमाणे कुशल/अकुशल मनुष्यबळ वापरुन, ज्यामध्ये कामगार/मजूर इत्यादींचा ही समावेश असतो; यांच्याकडून अशी कामे करुन घेतात. अशा व्यक्तींना किमान वेतन अधिनियम, १९४८ ( Minimum Wages Act, 1948 ) अंतर्गत निश्चित केल्याप्रमाणे किमान वेतन देणे कंत्राटदारांवर बंधनकारक आहे. तथापि काही ठिकाणी कंत्राटदारांकडून कामगार/मजूर इत्यादींना कायद्याप्रमाणे किमान वेतन देण्यात येत नाही अशा तक्रारी शासनाकडे प्राप्त होतात.

२. त्याअनुषंगाने साकल्याने विचार करुन शासन पुन्हा अशा सूचना देत आहे की, राज्यातील सर्व महानगरपालिका व नगरपरिषदांमार्फत देण्यात येणा-या सर्व कंत्राटांतर्गत कंत्राटदाराकडून कामावर ठेवलेल्या सर्व व्यक्तींना किमान वेतन कायद्यानुसार वेतन देण्यात येते हे सुनिश्चित करण्यात यावे. किमान वेतन कायद्यातील तरतूदींशी विसंगत कंत्राट करण्यात येणार नाही हे ही कटाक्षाने पाहण्यात यावे. सर्व

महानगरपालिका आयुक्त व मुख्याधिकारी नगरपरिषद यांनी ही बाब सर्व संबंधित अधिका-यांच्या निदर्शनास आणून देऊन या परिपत्रकाची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( डॉ. दिपक म्हैसेकर )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मंत्री (सर्व) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव-१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव- २, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१ मुंबई/ महालेखापाल, महाराष्ट्र-२ नागपूर
संचालक, अग्निशमन सेवा संचालनालय, विद्यानगरी, कालिना, मुंबई- ४०० ०९८
संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनलाय, वरळी मुंबई- ४०० ०२५.
आयुक्त, सर्व महानगरपालिका,
मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषदा / नगरपंचायत
विभागीय आयुक्त, सर्व
जिल्हाधिकारी, सर्व
संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
सर्व, मंत्रालयीन विभाग
नगर विकास विभाग, (कार्यासन क्रमांक २९) मंत्रालय, मुंबई-३२ यांना संकेतस्थळावर प्रसिध्दीसाठी
निवडनस्ती ( नवि-२० )

----------

G:/Minimum wages Act, Circular

एच-७९४८ -१अ.